**महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवर बाहयस्त्रोताद्वारे सेवा उपलब्ध करून घेण्यासाठी येणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण ८२२३/प्र.क्र.२५(ई.क्र.६४६४८२)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२५

**वाचा:-** १) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक विभाग क्र.संकीर्ण ८२२०/प्र.क्र.२६/सां.का.४, दिनांक ७ एप्रिल, २०२२

२) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक विभाग क्र.संकीर्ण ८२२३/प्र.क्र.२५/सां.का.४, दिनांक ८ जानेवारी, २०२४

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि २०१३/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २ डिसेंबर, २०१३

४) सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र.मराहिंसिंगुसाअ/आस्था/१४८४-१४८५/२०२५, दि. २०.०९.२०२४

५) सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र.मराहिंसिंगुसाअ/आस्था/७१९/२०२५, दि. २४.०३.२०२५

६) सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र.मराहिंसिंगुसाअ/आस्था/७५०-७५१/२०२५, दि. २६.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील ८ पदांच्या बाह्यस्त्रोतामार्फत दिनांक १ मार्च २०२२ ते ३१ जानेवारी २०२३ या ११ महिन्याच्या कालावधीकरीता उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात आली होती. उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील शासन परिपत्रकास अधिन राहून उपर्निर्दिष्ट क्र. ४,५ व ६ या पत्रान्वये सदर बाह्यस्त्रोत पुरवठादार संस्थेस सात महिन्यांची (०१ ऑक्टोबर २०२४ ते ३० एप्रिल २०२५) मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई मधील बाह्यस्त्रोत कर्मचाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यास मुदतवाढ देण्याची व त्यावरील होणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील खालील तपशीलात नमूद केल्यानुसार एकूण ०६ पदांच्या सेवा दिनांक ०१

ऑक्टोबर, २०२४ ते ३० एप्रिल, २०२५ या सात महिन्यांच्या कालावधीकरीता पात्र निविदा धारक मे. नित्यर्थ फॅसिलीटी मॅनेजमेंट ॲन्ड सर्व्हिसेस, जि. नाशिक या संस्थेकडून बाह्यस्त्रोत पध्दतीने उपलब्ध करुन घेण्यास व त्यावरील होणारा रुपये ११,७७,८७६/- (अक्षरी रुपये अकरा लक्ष सत्याहत्तर हजार आठशे आठ शहाहत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या रकमेस या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर पदांच्या सेवा बाह्यस्त्रोताद्वारे उपलब्ध करून घेण्यासाठी येणाऱ्या खर्चाचा तपशिल खालीलप्रमाणे :-

**( दि. ०१ ऑक्टोबर, २०२४ ते दि. ३० एप्रिल, २०२५ )**

| अ.क्र. | पदनाम | मासिक वेतन | पदसंख्या | स्तंभ ४ मधील पदसंख्येनुसार १ महीन्याच्या वेतनावरील एकूण खर्च | वेतनावरील एकूण खर्च (७ महीन्यांसाठी) | वस्तु व सेवाकर १८% | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | टिपणी सहायक | ३०००० | २ | ६०००० | ४२०००० | ७५६०० | ४,९५,६००/- |
| २ | लिपीक टंकलेखक | २३५०० | २ | ४७००० | ३२९००० | ५९२२० | ३,८८,२२०/- |
| ३ | शिपाई | १७८०० | २ | ३५६०० | २४९२०० | ४४८५६ | २,९४,०५६/- |
| | | **७१३००** | **६** | | **९,९८,२००/-** | **१,७९,६७६/-** | **११,७७,८७६/-** |

०२. सदरील खर्च संबंधित मुख्य लेखाशीर्ष क्र. २२०५, कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०८) (०१) हिंदी अकादमीची आस्थापना - (२२०५ १६८८), (०९) (०१) सिंधी अकादमीची आस्थापना - (२२०५ १६९७), (१२) (०१) गुजराती अकादमीची आस्थापना (२२०५ १७२१) “१० कंत्राटी सेवा” या लेखा उद्दिष्टाखाली संबधित साहित्य अकादमीकरीता त्या-त्या वित्तीय वर्षाकरीता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. याकरीता सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर पात्र निविदा धारकाने उपरोक्त नमूद तपशिलाप्रमाणे रक्कमांचे प्रदान संबंधितांना केली आहे तसेच त्यातून सर्व वैधानिक कपाती (उदा. कर्मचारी भविष्य निर्वाह निधी, कर्मचारी राज्य विमा, व्यवसाय कर, आयकर, महाराष्ट्र कामगार कल्याण निधी इ.) केल्या आहेत हे तपासण्याची तसेच यासबंधी वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या निधी वितरणाबाबतच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील. तसेच बाह्यस्त्रोत कर्मचाऱ्यांना पुरवठादारामार्फत प्राप्त होणारे यथायोग्य वेतन दरमहा मिळत असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

०५.  सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

०६.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२९१२३६२७९४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.29 12:37:26 +05'30'

**( बाळसाहेब सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी मुंबई
५. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२ महाराष्ट्र, नागपूर
११.कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१२.निवड नस्ती, सां.का.४